**“ग्रास” प्रणालीद्वारे ईलेक्ट्रॉनिक पध्दतीने चुकीचे/दुबार/अतिरिक्त प्रदान झाल्यास त्या रकमांचा परतावा करण्याबाबतची कार्यपध्दतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमआयएस-०१२३/प्र.क्र.११/राउशु-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- २४ एप्रिल, २०२३.

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण १००९/प्र.क्र.३२/कोषा प्र. ५, दि. १६.१२.२०११.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण १००९/प्र.क्र.३२/भाग-२/कोषा प्र.५, दि.१३.०८.२०१४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्र क्र. संकीर्ण १००९/प्र.क्र.३२/कोषा प्र.५, दि. ०१.०७.२०१६.
४) महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड पहिला नियम ३८३ ते ३८५.
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.७३/कोषा-प्रशा-४, दि. ०९.०१.२०२०.
६) राज्य उत्पादन शुल्क, पत्र क्र. लेखाशाखा/महसूली परतावा प्राधिकारी/२०२२-२३/ १३/न.क्र. ६५/५०, दि. ३०.११.२०२२

**प्रस्तावना :-**

शासनाच्या विविध विभागांशी संबंधित महसूली जमा रकमांचा भरणा “ग्रास” प्रणालीद्वारे ईलेक्ट्रॉनिक पध्दतीने शासन खाती भरण्याची सुविधा शासनाने उपलब्ध करुन दिली आहे. काही वेळा “ग्रास” प्रणालीतील सहभागी विभागांना त्यांचे विभागांशी संबंधित जमा लेखाशीर्षाखाली भरणा करताना चुकीच्या विभागाच्या नावे भरणा केला जातो किंवा दुबार/अतिरिक्त रकमेचे प्रदान केला जातो. याअनुषंगाने “ग्रास” प्रणालीद्वारे ईलेक्ट्रॉनिक पध्दतीने जमा होणा-या महसूलाचे चुकीचे/ दुबार/अतिरिक्त प्रदान झाल्यास त्या रकमांचा परतावा करण्याबाबत सक्षम प्राधिकारी प्राधिकृत परतावा मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य यांच्या अधिपत्याखालील सर्व विभागीय उप आयुक्त कार्यालयांतर्गत व अधीक्षक कायालयामार्फत “ग्रास” प्रणालीद्वारे ईलेक्ट्रॉनिक पध्दतीने चुकीचे/दुबार/अतिरिक्त रकमा प्रदान झाल्यास त्या रकमांचा परतावा करण्यासाठी खालीलप्रमाणे परतावा मंजूरी प्राधिकारी यांना प्राधिकृत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(अ) अतिरिक्त अनुज्ञप्ती शुल्काचा परतावा.

| अ.क्र. | परतावा मंजूरी प्राधिकारी | परताव्याची रक्कम मंजूर करावयाची मर्यादा |
|---|---|---|
| १. | विभाग प्रमुख | पूर्ण अधिकार |

(ब) अनुज्ञप्ती शुल्का व्यतिरिक्त इतर अतिरिक्त जमा रकमांचा परतावा.

| अ.क्र. | परतावा मंजूरी प्राधिकारी | परताव्याची रक्कम मंजूर करावयाची मर्यादा |
|---|---|---|
| १. | प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार |
| २. | विभाग प्रमुख | रुपये १०,००,०००/- पर्यंत |
| ३. | जिल्हाधिकारी | रुपये ५,००,०००/- पर्यंत |
| ४. | प्रादेशिक कार्यालय प्रमुख | रुपये २,००,०००/- पर्यंत |
| ५. | कार्यालय प्रमुख | रुपये १,००,०००/- पर्यंत |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. संकिर्ण २०१९/प्र.क्र. ७३/कोषा-प्रशा-४, दिनांक ०९.०१.२०२० अन्वये विभागप्रमुख यांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२४१६५९५०१०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP GORAKHNATH DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2023.04.24 17:06:23 +05'30'

**( सं. गो. ढाकणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (राउशु) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सर्व विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
५. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
६. सर्व निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
७. निवडनस्ती (राउशु-१).